**कार्यकारी अभियंता(स्थापत्य) संवर्गातील**
**<u>अधिकाऱ्यांच्या बदल्या/नियुक्त्या.</u>**

**महाराष्ट्र शासन**
जलसंपदा विभाग
शासन आदेश क्र. एलटीएस-१११११/(२७४/२०११)/भाग-१/आ (वर्ग-१).....(११)
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक :- ०६.०९.२०११

वाचा :शासन आदेश क्र. पीओजी-२०११/(९३)/आ (वर्ग-१)....(१),दिनांक ३१.०५.२०११

**<u>आदेश</u>**

संदर्भाधीन दि. ३१.०५.२०११ च्या आदेशान्वये **श्री. अ.सं.मोरे,** यांची पदोन्नतीने नियुक्ती **कार्यकारी अभियंता व उपसंचालक (प्रशासन), महाराष्ट्र अभियांत्रिकी प्रशिक्षण प्रबोधिनी, नाशिक** या पदावर करण्यात आली होती. आता सार्वजनिक सेवेच्या हितार्थ व प्रशासकिय सोईच्या दृष्टीने बदलीच्या अधिनियमातील कलम ४(४) व ४(५) नुसार त्यांचे नियुक्तीत अंशतः बदल करुन त्यांची सुधारित नियुक्ती **कार्यकारी अभियंता, जळगांव पाटबंधारे विभाग, जळगांव** या श्री.प्र.गो.सहस्त्रबुध्दे यांच्या बदलीने होणाऱ्या रिक्त पदावर करण्यात येत आहे.

२. श्री.मोरे यांच्या बदलीने होणाऱ्या रिक्त पदावर अन्य अधिकाऱ्याच्या नियुक्तीचे आदेश स्वतंत्रपणे काढण्यात येत आहेत.

३. संदर्भाधिन दि.३१.०५.२०११ च्या मुळ पदोन्नती आदेशातील अटी व शर्ती श्री.मोरे यांना लागू राहतील.

४. सदर आदेश महाराष्ट्र शासनाच्या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक **२०११०९०६१६५०५९००१** असा आहे.

हे आदेश तात्काळ अंमलात येतील.
महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

०६/०९/११
**(डॉ.माधव वीर)**
**शासनाचे अवर सचिव**

प्रत :-

प्रधान सचिव (जलसंपदा)/सचिव (लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
सर्व महासंचालक, जलसंपदा विभाग, / सर्व कार्यकारी संचालक, पाटबंधारे विकास महामंडळे
जलसंपदा विभागातील सर्व मुख्य अभियंते व सह सचिव, मंत्रालय, मुंबई
मुख्य अभियंता, तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगांव
मुख्य अभियंता व संचालक, महाराष्ट्र अभियांत्रिकी प्रशिक्षण प्रबोधिनी, नाशिक
अधीक्षक अभियंता व प्रशासक, लाक्षेविप्रा, जळगांव
संबधित जिल्हा कोषागार अधिकारी,
खाजगी सचिव, मा. मंत्री जलसंपदा (कृ.खो.पा.मं. वगळून), मंत्रालय, मुंबई
खाजगी सचिव, मा. मंत्री, जलसंपदा (कृष्णा खोरे पाटबंधारे महामंडळ),मंत्रालय, मुंबई
खाजगी सचिव, मा. राज्यमंत्री, (जलसंपदा), मंत्रालय, मुंबई
श्री.अ.सं.मोरे, कार्यकारी अभियंता
सह सचिव (सेवा) / अवर सचिव (सेवा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
कार्यासने - दक्षता-१/दक्षता-२/दक्षता-३ / गोपनीय शाखा (२ प्रती), जलसंपदा विभाग, मंत्रालय,मुंबई.
कार्यासन आ (वर्ग-१), संग्रहार्थ.